**कोविड-१९च्या प्रादुर्भावामुळे अर्थव्यवस्थेवर होणाऱ्या परिणामावरील उपाययोजना- मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण २०२०/प्र.क्र.१९(१)/साधनसंपती**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १३ एप्रिल, २०२०.

**प्रस्तावना** -

मार्च २०२० पासून महाराष्ट्रात कोविड-१९ या संसर्गजन्य रोगाचा प्रादुर्भाव झाला असून या रोगाने बाधित रुग्णांच्या संख्येत सातत्याने मोठ्या प्रमाणात वाढ होत आहे. यामुळे प्रतिबंधात्मक उपाययोजना म्हणून संपूर्ण देशात दि.२४ मार्च २०२० पासून लॉकडाऊन लागू करण्यात आला आहे. लॉकडाऊनव्दारे अनेक निर्बध घालण्यात आले आहेत. सदर निर्बधांमुळे राज्यातील सर्व उद्योग, व्यापार, सेवा क्षेत्र बंद पडलेले आहेत. त्यामुळे राज्याची अर्थव्यवस्था ठप्प झाली आहे. साहजिकच त्याचा विपरीत परिणाम राज्याच्या कर व करेतर महसूल संकलनावर झाला व होत आहे. सदर संसर्गाचा प्रादुर्भाव अदयापही वाढत असल्याने व त्यामुळे लागु केलेल्या लॉकडाऊनच्या अनुषंगाने राज्याची आर्थिक स्थिती पुढील काही महिन्यातही अशीच राहण्याची शक्यता आहे. या स्थितीतून बाहेर पडून राज्याच्या अर्थव्यवस्थेला उभारी आणण्याचे राज्यासमोर मोठे आव्हान आहे. यानुषंगाने अर्थव्यवस्थेचे पुनरुज्जीवन करण्यासंदर्भात प्रभावी उपाययोजना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

कोविड-१९ या संसर्गजन्य रोगाच्या प्रादुर्भावाच्या अनुषंगाने विविध उपाययोजना करण्यासाठी दिनांक ९ एप्रिल, २०२० रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत मा.उपमुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली ७ सदस्यांची मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आला. यानुसार मा.उपमुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली खालील सदस्यांची मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मा.श्री. अशोक चव्हाण | मंत्री, सार्वजनिक बांधकाम ( सार्वजनिक उपक्रम वगळून) |
| मा.श्री. छगन भुजबळ | मंत्री, अन्न व नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण |
| मा.श्री. जयंत पाटील | मंत्री, जलसंपदा व लाभक्षेत्र विकास |
| मा.श्री. बाळासाहेब थोरात | मंत्री, महसूल |
| मा.श्री. एकनाथ शिंदे | मंत्री, नगर विकास व सार्वजनिक बांधकाम(सार्वजनिक उपक्रमासह) |
| मा.श्री. अनिल परब | मंत्री, परिवहन व संसदीय कार्य |

अपर मुख्य सचिव (नियोजन) हे समितीचे सदस्य सचिव म्हणून काम पाहतील.

२. सदर समिती कोव्हीड-१९ च्या प्रादुर्भावाच्या अनुषंगाने निर्माण झालेल्या परिस्थितीच्या अनुषंगाने विविध उपाययोजना सुचविण्याचे काम करेल. तसेच शासन निर्णय़, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१९(२)/साधनसंपती, दिनांक १३.०४.२०२० अन्वये गठीत करण्यात आलेल्या तज्ञ समितीने केलेल्या शिफारशीं विचारात घेऊन त्यावर निर्णय घेईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००४१७१६१५५३६५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Balkrishna Kulkarni

**( ज.बा.कुलकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. सर्व सन्माननीय संसद, विधानसभा व विधानपरिषद सदस्य,
६. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
७. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
८. सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
९. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१०. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर,
११. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२ , मुंबई/नागपूर,
१२. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१३. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
१४. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा/ विधानपरिषद), मुंबई,
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१६. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२०,
१७. इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- २५,
१८. नॅशनॅलिस्ट काँग्रेस पार्टी, ठाकरसी हाऊस, जे.एन. हेराडीया मार्ग, बलार्ड इस्टेट, मुंबई ४०० ००१,
१९. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८,
२०. बहुजन समाज पार्टी, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, प्लॉट नं. ८३-अे, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-१४,
२१. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४०० ००४,

२२. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅसेज, लोअर परळ, मुंबई-४०००१३,

२३. महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४०० ०२८,

२४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन ,मुंबई,

२५. वित्त विभागातील सर्व कार्यासने/निवड नस्ती, वित्त विभाग (साधनसंपती).